**आंगणवाडी सेविका / मदतनीस यांचे मानधन**
**नियमित प्रदान करण्यासाठीची उपाययोजना.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२००९/प्र.क्र.६/कोषा प्र-५.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ११ ऑगस्ट, २००९.

**संदर्भ:-** शासन परिपत्रक क्र. संकीर्ण १००९/ प्र.क्र. ६/ कोषा प्र ५, दि. ०३ /०२/२००९.

**परिपत्रक:**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत आंगणवाडी सेविका व मदतनीस यांना नियमित मानधन व वाढीव मानधन प्रदान करण्यात देते. सदर मानधनाची तरतूद "२२३६ - पोषण आहार" या मुख्य लेखाशीर्षाखाली असलेले एकुण ६ योजनांखाली करण्यात येत असते. सदर योजनांचे संकेतांक पुढीलप्रमाणे आहेत.

(१) २२३६ ००२ ७, (२) २२३६ ००६ ३, (३) २२३६ ००७ २,
(४) २२३६ ०५१ ९, (५) २२३६ ०५४ ६, (६) २२३६ ०१८ १.

उपरोक्त संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र कोषागार नियमावलीतील नियम क्र. १५३ (१०) मध्ये अस्तित्वात असलेली तरतूद " २२३६- पोषण आहार" या मुख्य लेखाशीर्षाखाली असलेले "०२-मजूरी" या तपशीलवार शीर्षातून होणाऱ्या मानधनाच्या प्रदानाकरीता लागू करण्यात आलेली आहे. परंतू वरील ६ योजनांपैकी २२३६ ००२ ७ व २२३६ ००७ २ हे संकेतांक असलेल्या योजनेत मानधन / वाढीव मानधनाचे प्रदान "३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या तपशीलवार लेखाशीर्षाखाली असलेल्या तरतूदीतून करण्यात येते. त्यामुळे बी. डी. एस. प्रणालीतून मानधन / वाढीव मानधनाच्या देयकासोबत जोडण्यासाठी प्राप्त होणारे प्राधिकारपत्र हे "३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या शीर्षातून प्राप्त होत असते.

उपरोक्त वस्तुस्थितीचा विचार करुन शासनाचे असे आदेश आहेत की, संकेतांक क्रमांक २२३६ ००२ ७ व २२३६ ००७ २ हया दोन योजनेखाली फक्त मानधन / वाढीव मानधन याचे प्रदान करण्यासाठी विशेष बाब म्हणून महाराष्ट्र कोषागार नियमावलीतील नियम क्र. १५३ (१०) मध्ये अस्तित्वात असलेली तरतुद "३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या तपशिलवार लेखाशीर्षाला लागू करण्यात येत आहे.

परंतू, सदर सूट फक्त मानधन / वाढीव मानधन याचे प्रदान करण्यापुरतीच मर्यादित राहील याची सर्वांनी नोंद घ्यावी. ही सुविधा दिनांक ३१/१२/२००९ पर्यंतच देण्यात येत आहे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८१११३०५३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स.अ.मु.नकवी )
शासनाचे उप सचिव

प्रति,
राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

- सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
- प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
- प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
- प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उपसंचालक, ले. व को. पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, कार्यासन-४ मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, कोषा प्रशा-५ कार्यासन, वित्त विभाग

----------